**आष्टा नगरपरिषदेतील सोमलिंग तलावाच्या पर्यावरण संवर्धनासाठी नगरपरिषदेकडून राबवण्यात येणा-या प्रकल्पातील कामांच्या खर्चास प्रशासकीय मान्यता व निधी मुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०१४/प्र.क्र.२०/तां.क.३**

नवीन प्रशासन भवन,१५ वा मजला,हुतात्मा राजगुरू चैाक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०६ जानेवारी, २०१५.

**वाचा -**

१. आष्टा नगरपरिषद यांचे Pre-feasibility report, दिनांक: २४ जून, २०१४.
२. पर्यावरण विभागाचे पत्र क्रमांकः रासयो-२०१४/ प्र.क्र.४२/तां.क.३, दिनांक: २८ ऑगस्ट, २०१४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील तलाव, सरोवरे व मोठे जलाशय यांचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी राज्य शासनाने राज्य सरोवर संवर्धन योजना सन २००६-०७ या वर्षापासून सुरू केली आहे.या योजनेंतर्गत सर्वसाधारणपणे खालील मुख्य कामांचा समावेश होतो.

१. तलावाच्या पाण्याचे प्रदूषण करणारे स्त्रोत निश्चित करून प्रदुषण रोखण्यासाठी उपाययोजना करणे.
२. तलावात साचलेला अनावश्यक घातक व ऑरगॅनीक गाळ काढणे.
३. तलावाची गुणवत्ता टिकविण्याकरीता,
   अ) तलावातील अनावश्यक व उपद्रवी वनस्पती नष्ट करून त्यांची वाढ नियंत्रणात आणण्यासाठी उपायोजना करणे.
   ब) तलावांतर्गत जैविक प्रक्रियेव्दारे तलावातील पाण्याची गुणवत्ता सुधारणे.
   क) किनारा सौदर्यीकरण, हरीत पट्टा विकसीत करणे, कुंपण घालणे, मनोरंजनासाठी बालोद्यान, नौकाविहार, कमी किमतीची स्वच्छतागृहे इत्यादी.
४. जनसहभाग व जनजागृतीसाठी कार्यक्रम तसेच प्रदूषण रोखण्यासाठी स्थानिक परीस्थितीनुसार करावयाच्या उपाययोजना.

या योजनेतंर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात आष्टा नगरपरिषदेमार्फत सादर सोमलिंग तलावाचा प्रस्ताव मंजूर करण्याचे व आरंभिक कामांसाठी निधी मुक्त करण्याचे शासन विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

राज्य योजनेखाली राज्य सरोवर संवर्धन योजनेअंतर्गत आष्टा नगरपरिषदेमार्फत सादर सोमलिंग तलावाच्या पर्यावरणीयदृष्टया संवर्धनासाठीच्या प्रस्तावावर सुकाणू समितीच्या दि.२८ ऑगस्ट, २०१४ च्या बैठकीत चर्चा करण्यात आली व सदर मान्यतेच्या अनुषंगाने De-weeding, desilting, Low cost Toilet block, Lake surrounding area treatment through Afforestation, Stonlines on bund slope, Vegetative stabilization of lake shore slopes , earthen bund slope; Strengthening of stone bund, Solid Waste Disposal Facility & Nirmalya Kalash; Conservation and protection of bird habitats; Fencing - barbed wire & vegetative fencing तसेच Rain water harvesting system at Somling temple and recharge pits in lake surroundings; Awareness campaign and informative signages Development of Nakshtra Vriksha Garden near temple, Ganesha Idol Immersion इत्यादी कामे, धोबी घाट व त्यातून निघणा-या पाण्यावरील प्रक्रिया या कामांच्या सहभाग व wet land birds जैव विविधता विषयक अभ्यास सादर करणे इ. तसेच, पर्यावरणीय बाबींशी संबंधित कामांचा व Non-core works एकूण खर्चाच्या २५% मर्यादेत ठेवण्याच्या अटीसह प्रस्तावास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सुकाणू समितीच्या बैठकीच्या इतिवृत्तातील निर्णयाच्या अधीन राहून Detail Project Report (DPR) तयार करणे, त्यास तांत्रिक मान्यता घेणे, विविध Tendering Process, चांगल्या पर्यावरण तज्ञ सल्लागार संस्थेची निवड व आरंभिक काम इत्यादीसाठी Mobilization Fund म्हणून रू.२५.०० लाख (रूपये पंचवीस लाख फक्त ) एवढी रक्कम मुख्याधिकारी, आष्टा नगरपरिषद यांना वितरीत / मुक्त करण्यास या शासन निर्णयाद्वारे खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. उपरोक्त मान्यतेच्या अनुषंगाने आष्टा नगर परिषदेने उपरोक्त मंजूर केलेल्या कामांचा जलसंपदा विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या DSR किंमती प्रमाणे करून प्रस्ताव तात्काळ पुढील तीन माहिन्यात शासनाकडे सादर करावा. उपरोक्त वितरित करण्यात येत असलेला रू.२५ लाखाचा निधी अंतिम मंजूर प्रस्तावास निधी मुक्त करताना त्यामधून वळता करून उर्वरित निधी मुक्त करण्यात येईल.

२. प्रकल्पाची यथायोग्य अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीकोनातून प्रकल्प सनियंत्रण समितीची मुख्याधिकारी, आष्टा नगरपरिषद यांच्या अध्यक्षतेखाली स्थापना करण्यात यावी. या समितीत नगरपरिषदेतील संबधित अधिकारी, कर्मचारी, पर्यावरण विषयक तज्ञ/तलाव विज्ञन विषयक तज्ञ, उपरोक्त प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेचे

प्रतिनिधी यांच्यासह नगरपरिषदेस आवश्यक वाटतील अशा प्रतिनिधींचा समावेश करण्यात यावा. ही समिती प्रकल्पांतर्गत होत असलेल्या सर्व कामकाजाचे सनियंत्रण करेल व कामांच्या गुणवत्तेंवर नियंत्रण ठेवेल. सदर समितीची आढावा बैठक दर महिन्याला आयोजित करण्यात यावी व प्रत्येक बैठकीचे इतिवृत पर्यावरण विभागास पाठवावे.

३ . योजनेतंर्गत मंजूर विशिष्ट कामासाठी अदा केलेली वा मान्य केलेली रक्कम त्याच कामासाठी राज्य शासनाने घालून दिलेल्या अटी व शर्ती प्रमाणे व विहीत कालमर्यादेत मान्य केलेल्या खर्चाच्या मर्यादेत खर्च करणे आवश्यक आहे. हा निधी इतर दुस-या कोणत्याही कामासाठी वा नगरपरिषदेच्या कामासाठी वापरता येणार नाही किंवा वळता करता येणार नाही.

४. या योजनेतंर्गत प्राप्त होणारा निधी हा राष्ट्रीयीकृत बॅकेत स्वतंत्र खाते उघडून त्या अंतर्गत जमा करावा व बॅकेत ठेवलेल्या निधीवर मिळणारे व्याज याच निधीत जमा करावे. या निधीच्या उपयोगितेवर नियंत्रण राहण्यासाठी खात्याचे संचालन मुख्याधिकारी, आष्टा नगरपरिषद यांच्याद्वारे करण्यात यावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतेवेळी बँकेतील या खात्यावर झालेल्या व्यवहाराच्या नोंदी दर्शविणा-या पासबुकाची साक्षांकित प्रत सोबत जोडण्यात यावी.

५. योजनेतंर्गत खर्च करण्यात येणा-या रकमेचे लेखे प्रचलित लेखा संहितेनुसारच ठेवण्यात यावेत व त्याचे लेखापरीक्षण स्थानिक निधी व लेखापाल यांच्याद्वारे करण्यात यावे व त्याचा अहवाल पर्यावरण विभागास पाठविण्यात यावा.तसेच झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित महालेखापाल कार्यालयास पाठविण्याचा जबाबदारी नगरपरिषदेची राहिल.

६. योजनेतंर्गत नगरपरिषदेच्या होणा-या आस्थापनेवरील व लागणा-या मनुष्यबळावरील खर्च संबंधीत नगरपरिषदेद्वारे करण्यात येईल. त्यासाठी या विभागाकडून अनुदान देण्यात येणार नाही.

३. या साठी मुख्याधिकारी, आष्टा नगरपरिषद (Chief Officer, Municipal Council, Ashta ) यांचे नांवे रू.२५ लाख (रूपये पंचवीस लाख फक्त) एवढ्या रकमेचा धनादेश काढण्यात यावा.

४. आष्टा नगरपरिषदेस अदा करावयाची रू.२५ लाख एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून मुख्याधिकारी,आष्टा नगरपरिषद यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. र.ल.लखोटे, कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक

अधिकारी म्हणून श्री. सो.ना. बागुल, उपसचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषीत करण्यात येत आहे. त्यांनी मुख्याधिकारी, आष्टा नगरपरिषद यांना रू.२५ लाख (रूपये पंचावीस लाख फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाद्वारे वितरित करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च "मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितिकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण,१०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२)(०७) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ च्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा.

६. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३२१/१४/व्यय-१६, दिनांक २८ नोव्हेंबर, २०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०८१७२३४६४५०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra
Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=ENVD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2015.01.08 17:32:46 +05'30'

**( र.ल.लखोटे )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी, जिल्हा सांगली.
२. मुख्याधिकारी, आष्टा नगर परिषद, आष्टा, जिल्हा सांगली.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
७. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
८. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
९. प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१०. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
११. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१२. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती.